सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर या कार्यालयातील "आस्थापना अधिकारी(गट-ब/राजपत्रित)"संवर्गातील एकाकी रिक्त पदावर पदोन्नतीने नियुक्ती देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
विधि व न्याय विभाग
शासन निर्णय क्र.सवना-१९२४/७७/प्र.क्र.१५/का.८
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई: ४०० ०३२
दिनांक: २९ मे, २०२४

वाचा:- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्या-१२, दि.०१.०८.२०१९
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि.०७.०५.२०२१
३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.दिव्यांग-२०२२/प्र.क्र.८३/१६-अ,दि.२०.०४.२०२३
४) सह सचिव, विधि व न्याय विभाग, नागपूर यांचे जा. क्र. सवना-१०२३/प्र.क्र.१५२/२०२३/०२, दि.१६.०१.२०२४ रोजीचे पत्र.
५) पदोन्नती समितीचे दि.११.०१.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना:-

विधि व न्याय विभाग, शासन निर्णय दि.१८.०४.२०२३ अन्वये १३ सरकारी वकील कार्यालयांचा सुधारित आकृतीबंध मंजूर करण्यात आलेला आहे. त्यानुसार सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर या कार्यालयासाठी "आस्थापना अधिकारी (गट-ब राजपत्रित)" या संवर्गात १ पद मंजूर आहे. सदर पद श्री.सु.प्र. बडगे, तत्कालीन आस्थापना अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी (गट-ब राजपत्रित) हे नियत वयोमानानुसार दि.३१.१२.२०२३ रोजी शासन सेवेतून सेवानिवृत्त झाल्यामुळे रिक्त झालेले आहे.

२. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निवाड्यानुसार पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविलेले आहे. तसेच, मा. सर्वोच्च न्यायालयाने मा. उच्च न्यायालयाच्या सदर निर्णयास स्थगिती दिलेली नसल्याने, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६ ब, दि.०७.०५.२०२१ अन्वये, विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील सर्वोच्च न्यायालयाच्या निवाड्याच्या अधिन राहून, पदोन्नतीच्या कोट्यातील रिक्त पदे, दि.२५.०५.२००४ च्या स्थितीनुसार सेवाज्येष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत निर्देश दिलेले आहेत.

३. सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर व मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर या कार्यालयांची सेवाज्येष्ठता सूची सामायिक आहे. त्यामुळे उपरोक्त दोन कार्यालयांसाठी पदोन्नती समिती सामायिक स्वरुपात गठित करण्यात आलेली आहे. सदर पदोन्नती समितीच्या वतीने विधि व न्याय विभाग, नागपूर या कार्यालयाने त्यांच्या दि.१६.०१.२०२४ रोजीच्या पत्रान्वये मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर या कार्यालयातील अधिक्षक श्री. भो.ग. वानखेडे यांना रिक्त असलेल्या "आस्थापना अधिकारी (गट-ब राजपत्रित)" या पदावर पदोन्नतीने नियुक्ती देण्याबाबत शिफारस केलेली आहे. त्यानुषंगाने, सन २०२३-२०२४ च्या निवडसूचीला मान्यता देण्याची आणि सेवाज्येष्ठता सूचीनुसार पात्र असलेले अधिक्षक श्री. भो.ग. वानखेडे यांना रिक्त असलेल्या "आस्थापना अधिकारी (गट-ब राजपत्रित)" या पदावर पदोन्नतीने तात्पुरती नियुक्ती देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**:-

सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर या कार्यालयातील "आस्थापना अधिकारी (गट-ब राजपत्रित)" या संवर्गातील एकाकी रिक्त पदावर पदोन्नती देण्यासाठी निम्न संवर्गाच्या २०२३-२०२४ वर्षाच्या खालील निवडसूचीस शासन मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | ज्येष्ठता क्र. | अधिका-याचे नाव | जात प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २९अ | श्री. भो.ग. वानखेडे | इमाव | सेवाज्येष्ठतेनुसार पात्र |

२. तसेच, सरकारी वकीलांचे कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर या कार्यालयातील रिक्त असलेल्या "आस्थापना अधिकारी (गट-ब राजपत्रित)" (सहाव्या वेतन आयोगानुसारची वेतनश्रेणी, पे बँड रु.९३००-३४८०० अधिक ग्रेड वेतन रु. ४६००, तसेच, सातव्या वेतन आयोगानुसार सुधारित वेतनस्तर S-१६: ४४९००-१४२०४००) या पदावर खालील तक्त्यातील तपशीलानुसार श्री. भो. ग. वानखेडे अधिक्षक (गट-ब/अराजपत्रित) यांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून निव्वळ सेवा ज्येष्ठतेनुसार व पात्रतेनुसार, तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | उमेदवाराचे नाव व जात प्रवर्ग | विद्यमान पदनाम व कार्यालय | दि.२५.०४.२००४ च्या स्थितीनुसार सेवाज्येष्ठता क्रमांक | पदोन्नतीचे पद व कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.भो.ग. वानखेडे (इ.मा.व) | अधिक्षक, मुख्य सादरकर्ता अधिकारी कार्यालय, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर | सेवाज्येष्ठता क्रमांक १ | आस्थापना अधिकारी(गट-ब राजपत्रित), सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर |

३. सदर पदोन्नती पुढील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

१) निवडसूची तयार करतांना कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

२) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निवाड्याच्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि./१६ब कार्यासनाच्या दि.०७.०५.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या सूचनांनुसार सदर पदोन्नतीला मान्यता देण्यात येत आहे.

३) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.दिव्यांग-२०२२/प्र.क्र.८३/१६-अ, दि.२०.०४.२०२३ अन्वये दिलेल्या निर्देशांच्या अधीन राहून निवडसूची व पदोन्नतीला मान्यता देण्यात येत आहे.

४) सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नती राहील. या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिका-यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

५) उपरोक्त तक्त्यातील अधिक्षक यांचेविरुध्द, महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील नियम ८ व १० खाली विभागीय चौकशी चालू अथवा प्रस्तावित नाही.

६) निवडसूचीतील अधिकारी यांनी सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०१.०८.२०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषांची पूर्तता केलेली आहे.

७) सदर निवडसूचीतील सेवा ज्येष्ठतेनुसार पात्र असलेल्या, तथापि, पदोन्नती नाकारलेल्या अधिका-यांच्या पदोन्नती संदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१२.०९.२०१६ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन शासन मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०५२९१५५१२६९९१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SWATI LOHAR

Digitally signed by SWATI LOHAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, 2.5.4.20=eaef1faf1fb5262ec7b0737903120dfa387867f017650e284f3e90868f26d12d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AB72B061785AE0359686D1C8A0DDB0F52744A155BE1924D6AB3706E1DE7E60EC, cn=SWATI LOHAR
Date: 2024.05.29 16:05:16 +05'30'

**( स्वा. सु. लोहार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, उपमुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान सचिव व विधि परामर्शी, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
४) सह सचिव, विधि व न्याय विभाग, शाखा नागपूर.
५) सरकारी वकील, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर.
६) मुख्य सादरकर्ता अधिकारी, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर.
७) अधिक्षक, मुख्य सादरकर्ता अधिकारी कार्यालय, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, नागपूर.
८) आस्थापना अधिकारी, सरकारी वकील कार्यालय, उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर.
९) महालेखापाल (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर (२ प्रती).
११) सामान्य प्रशासन विभाग/कार्या.१२ (सेवा-१), मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती/कार्या.८